अपरांतक लक्ष्मणराव सरदेसाई विशेषांक मार्च २००४ अपरांतक लक्ष्मणराव सरदेसाई विशेषांक मार्च २००४ अपरांतक

कोंकणी–मराठी सांस्कृतिक मासिक पत्रिका

(खाजगी वितरणाकरिता)

# अपरांतक

वर्ष :१ : अंक :३: मार्च २००४

संपादक : डॉ. बाळकृष्णजी कानोळकर ❖ देणगी मूल्य : ८० रुपये फक्त

(सभासदास रु. १० व विद्यार्थी सभासदास रु. ६ फक्त)

" मी कोंकणीचा कट्टा पुरस्कर्ता असूनही मराठीचा निष्ठावंत सेवक आहे. "




परा – प्रतिमा प्रकाशन ; तुये, पेडणे – गोवा.

अपरांतक लक्ष्मणराव सरदेसाई विशेषांक मार्च २००४ अपरांतक लक्ष्मणराव सरदेसाई विशेषांक मार्च

# अपरांतक

**कोंकणी-मराठी सांस्कृतिक**

**मासिक पत्रिका**

(खाजगी वितरणाकरिता)

र्ष :१ : अंक :३: मार्च, २००४

(प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई विशेषांक)

: संपादक :

**डॉ. बाळकृष्णजी कानोळकर**

: मुद्रक आणि प्रकाशक :

जी. डी. कानोळकर,

**परा-प्रतिमा प्रकाशन,**

तुये, पेडणे गोवा; 403 512

**: अक्षरजुळवणी :**

कॉम्प्युटर ग्राफीक्स, १८ जून मार्ग,

पणजी - गोवा, 403 001

दूरध्वनी:3112168

**: कव्हर फोटो :**

सौ. नारायणबाब मावजो हांच्या बरेपणान.

**: पत्र व्यवहाराचा पत्ता :**

संपादक, मासिक 'अपरांतक',

एस् - २, दुसरा मजला,

शारदा अपार्टमेंटस्

आयूडी हॉस्पिटल समोर,

स्क, फोंडा-गोवा. 403 001

रध्वनी: (0832) 2316906

**देणगी मूल्य :** रु. ८० फक्त

**भासद वर्गणी (विशेषांकासह)**

र्षिक -- रु. १०० फक्त

विद्यार्थ्यांकरिता-रु. ७० फक्त)

वार्षिक - रु. ३०० फक्त


## अंतरंग

# शब्दसृष्टीच्या ईश्वरा, नमोस्तुते ! नमोस्तुते !! नमोस्तुते !!!



१७ मार्च १९०४ ! गोमंतकातल्या एका छोट्याशाच परंतु संस्कृतिसमृध्द गावात, सावई – वेरेत, एका शब्दसृष्टीच्या ईश्वराचा जन्म झाला. या घटनेला आता १०० वर्षे होऊन गेली. लक्ष्मणराव सरदेसाई या लौकिक नावाने ते जगाच्या बाजारात वावरले. तृप्त मी फकीर मी अशा कलंदरवृत्तीने उभे आयुष्य त्यांनी शब्दब्रह्म्याच्या उपासनेत वेंचले. आपल्या कलावती लेखणीच्या छिन्नीने अनेकानेक अद्वितीय साहित्याशिल्पे प्राप्तकालच्या विशाल भूधरातून कोरून काढली. मुक्तीपूर्व गोमंतकाच्या समाज–सांस्कृतिक जीवनाचा हा बखरकार आपल्यामागे प्रचंड ज्ञानधन ठेवून गेला. परंतु आम्ही गोवेकर इतके करंटे की त्यांच्या जन्मशताब्दीचे साधे स्मरण देखील आपल्याला झाले नाही. ' थोरपरंपरांचा आदर्श पाळला पाहिजे ' याचे पोकळ नगारे वाजविण्यातच आमचे हात विशुल होऊन पडले. शब्दसृष्टीच्या या ईश्वराचे एखादे लहानसेच का होईना, स्मारक आमच्या वंशजाना स्फुर्तिदायक ठरावे म्हणून आम्ही काहीच करू शकलो नाही. ' समग्र लक्ष्मणराव ' हे त्यांचे स्वप्न होते. ते स्वप्नच राहिले. ते पूर्ण होते तर गत गोमंतकाच्या सांस्कृतिक जीवनाचा विश्वकोशच आज आपणास उपलब्ध झाला असता. परंतु अजूनही वेळ गेलेली नाही. त्यांच्या या जन्मशताब्दी वर्षानिमित्य आम्ही तसा संकल्प तरी करू शकतो की नाही ? की आपण ठार करंटे आहोत ?

लक्ष्मणराव केवळ थोर साहित्यिक, कथाकारच नव्हते तर ते या मुक्त गोमंतकाचे निर्मातेही आहेत. आपल्या ऐन उमेदीच्या नि कर्तृत्त्वाच्या कालखंडात निरीष्य विद्यादानाने त्यांनी एक उर्ज्वस्वल पिढी घडविली. ' दीप पेटवूनी घरदाराचे । पूजन केले स्वातंत्र्याचे ' या कविउक्तीला सार्थ करणारा संर्घष त्यांनी गोमंतभूच्या मुक्तीसाठी अविरतपणे केला. जेव्हा गोमंतकाच्या स्वायत्ततेचा यक्ष प्रश्न इथे उभा ठाकला तेव्हा महाराष्ट्रवाद्यांच्या वसाहतवादाला विरोध करण्यासाठी हा भूमिपूत्र आपल्या उतारवयातही सर्वशक्तीनिशी झुंजत राहिला. १९७७ साली आणीबाणीच्या रूपाने मानवी स्वातंत्र्यावरच जेव्हा गदा आली तेव्हाही हा जराजर्जर देशभक्त भीष्मपितामहाच्या आवेशात लढला.

लक्ष्मणराव एक श्रेष्ठ साहित्यिक, एक कर्तृत्ववान शिक्षणतज्ञ, एक निर्भीड पत्रकार, एक समाजवत्सल समाजकारणी तर ते होतेच परंतु या सर्वापेक्षा अधिक ते स्वातंत्र्याचे पुजारी होते. कोणत्याही प्रकारचे पारतंत्र्य, दास्यत्व त्यांना मान्य नव्हते. म्हणूनच जेव्हा

जेव्हा या स्वातंत्र्याला–भूस्वातंत्र्याला, देशस्वातंत्र्याला, भाषास्वातंत्र्याला, मानवीस्
–पारतंत्र्याचा धोका निमार्ण झाला तेव्हा तेव्हा ते प्रंसगी आप्तस्वकीयांशी देखील नि
निडरपणे झुंजले. लक्ष्मणराव या हरएक संग्रामात यशस्वी झाले. परंतु यशाची फळे चा
वेळी ते निर्मोहीपणे त्यापासून दूरच राहिले. म्हणूनच कदाचित आज आपण त्या
त्यांना विसरण्याचे पातक करू धजावलो. हा माणूस महाराष्ट्रात जन्मला असता
सोनेच झाले असते. हे शब्दसृष्टीच्या ईश्वरा, तुझी अज्ञान (आणि सज्ञानही) ले
करताहेत तें त्यांना कळत नाही; त्यांना क्षमा कर !

लक्ष्मणरावांच्या जन्मशताब्दीवर्षानिमित्त आपल्या ताकदीबाहेर असूनही 'अपर
एक विशेषांक प्रसिद्ध करून त्यांच्या कार्यकर्तृत्त्वाचे स्मरण करण्याचे ठरविले. या
आम्हाला ज्यांनी सतत स्फुर्ती आणि प्रोत्साहन दिले त्या श्रीमान कवी वेणिमाधव
रवीन्द्र केळेकर, नारायण मावजो, माधवी सरदेसाई, नागेश करमली यांचे आम्ही शत
आहोत. डॉ. वासुदेव सावंत व डॉ. चंद्रलेखा डिसौजा यांनी आपले समीक्षालेख
आमचा हा विशेषांक संदर्भसंपृक्त होण्यास हातभार लावला त्यांचेही आम्ही ऋणी
कवी वेणिमाधव बोरकर व प्रा. माधवी सरदेसाई यांनी आपल्या संग्रहातली काही क
टीपणें व पत्रें उपलब्ध करून दिली. श्रीमान नारायण मावजो यांनी दुर्मिळ फोटो
करून दिले. परिणामत: या विशेषांकाची संदर्भसंपृक्तता वृद्धिंगत होण्यास मदत
लक्ष्मणराव व त्यांचे साहित्य या विषयांची बरीचशी नवी माहिती या विशेषांकांद्वारे
उजेडात आणण्याचे भाग्य आम्हाला लाभलें आहे. ज्या आश्रयदात्यानी आम्हाला ज
देवून हा गोवर्धन उचलायला हिम्मत दिली त्यांनी आम्हाला उपकृत केलेच आहे.
नीलेश बुगडे यांनी या शब्दयज्ञाला अक्षर रूप दिले तर घरच्याच परा–प्रतिमा प्रका
संस्थेने त्याला प्रकाश दाखविण्याचे कार्य करून तो लोकाना सादर केला. या प्रसंगी
परम स्नेही कृष्णा पै यांचेही आभार मानलेच पाहिजेत.

पुढील उपक्रमांतही या सर्वाचे असेच सहाय्य 'अपरांतक'ला सदोदित ला
सदिच्छा ! आता आमच्या वर्गणीदार सभासदांनी, चोखंदळ वाचकांनी, व्यासंगी समी
निरलस सुहृदांनी या विशेषांकाचे सहर्ष उदंड स्वागत करून आमच्या उपक्रमाला
दिशा प्राप्त करून द्यावी; अशी प्रार्थना करून शब्दसृष्टीच्या ईश्वराला वाहिलेले हे स्
आम्ही लोकार्पण करित आहोत.

– स

०९ – ०३ – २००४

# पाळण्यातले पाय



**ऐन पंचविशीत कथेच्या शोधात...**

('लक्षदा', दिवाळी १९८६च्या सौजन्याने.)

" मला पुस्तकांनी प्रेरणा दिली नाही. विद्वानांच्या भाषणांनी, संतमहंतांच्या उपदेशांनी ती मिळाली नाही.... जेथे हृदयाची उदात्तता (sublimity) आहे तेथे मला प्रेरणा मिळते. "

**– लक्ष्मणराव सरदेसाई**

अपरांतक लक्ष्मणराव सरदेसाई विशेषांक मार्च २००४ अपरांतक लक्ष्मणराव सरदेसाई विशेषांक मार्च २००४ अपरांतक लक्ष्मणराव सरदेसाई विशेषांक मार्च

Reg. No- 68
Rec. No. 187
Fees: 2/-

GOVERNMENT OF GOA, DAMAN AND DIU

DIRECTORATE OF PLANNING, STATISTICS AND EVALUATION

FORM No. 9

*(See Rule 9)*

CERTIFICATE OF BIRTH ~~issued under section 12~~ / issued under section 17 of the Registratio[n] of Births and Dea[ths] Act, 1969

This is to certify that the following information has been taken from [the] original record of birth which is in the register for Verem

Taluka Ponda (local area) of District Goa of Union Territory Goa, Daman and Diu.

Name Loximona Suria Rau Dessay

Sex Male

Date of Birth 17th March, 1904 (four) — Registration No. 4

Place of Birth Modlovado, Verem — Date of Registration 28/3/

Name of Father Xrypadá Suria Rau Dessay — Permanent address of Father /Mother

Name of Mother Caxibay Dessaina

Nationality of Father

Nationality of Mother

Name of Grandfather (father's side) Bagy Gonoxama Suria Rau De[ssay]

Name of Grandmother (father's side) Sundora Bay Dessaina




Signature of issuing authority

Chief Registrar
(Facsimile signature)

Date 17/4/1985

प्रा. लक्ष्मणराव सदेसाई यांचा जन्मनोंद दाखला

(प्रा. माधवी सरदेसाई यांच्या सौजन्याने.)

# मला लेखक व्हायचे आहे !

–प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई

शाळेत शिकत असतानाच म्हणजे वयाच्या दहाव्या वर्षी माझ्या हातून पहिले लेखन ाले. घरची सगळी वडील माणसे 'गुडगुडी' ओढीत चौपेटीवर किंवा माड्यांवर ही गुडगुडी सायची. गुडगुडी ओढून झाल्यावर ते खोकू लागत, घामेजत आणि खोकून खोकून दमले णजे मिळेल तिथे थुंकत. मला हे आवडत नव्हते. मी मनात म्हणत होतो तुम्ही हवी तकी गुडगुडी ओढा, मरेपर्यंत खोकत रहा, पण तुमची थुंकी, ते बेडके जमिनीवर का ?

एक दिवस त्यांच्या थुंकीत माझी गोटी पडली. माझ्या मस्तकात सणक उठली. तुम्ही हातारे झालात म्हणून काय झालं ? आम्ही मुलानी मात्र घरात काजूच्या बियांनी खेळायचे ाही. दुपारच्या वेळी डोंगरावर जायचे नाही. कारण 'आम्ही थोरांची लेकूरे, टाकू, जपुनी ाऊले'. मी मनात म्हटले तुम्हाला धडा शिकवीन तर खरा. लगोलग मी लिहायला बसलो ाणि धुम्रपानाचे दुष्परिणाम या मथळ्याखाली बराच मजकूर लिहून काढला. दोन दिवस पून त्याच्या चार नकला काढल्या आणि चार ठिकाणी भिंतीवर गोंदाने त्या डकवून ाकल्या. थोड्याच वेळाने घरात भूकंप झाला. पांडूबाब, पोकेबाब वगैरे म्हातारे ओरडत मला ोधीत फिरू लागले. मला 'मादरचोद' 'आपसूलाद' 'तर्पाशोर' अशा नकसूद परदेशी शिव्या ऊ लागले. मला मारायला शोधू लागले. तीन चौपेट्याचे आमचे घर. २५–३० माड्यांचे. ते हातारे नि मी लहान. मी त्यांना थोडाच सापडतो. दोन तीन दिवस मी त्यांना दिसलोच ाही. फार सांभाळून वागवे लागले, पण माझी मात्रा लागू पडली. त्या दिवसापासून घराच्या भंतीवर, फरशीवर, पायऱ्यांवर थू थू करून थुंकायचे त्यांनी बंद केले. माझ्या शक्तीचा हिला प्रत्यय मला आला तो असा.

प्राथमिक शिक्षण गावात पुरे झाल्यावर लिसेवच्या शिक्षणासाठी मी पणजीला आलो. लिसेवात मला आलेला अनुभव असा की, तेथे मिळणारे शिक्षण अगदीच तकलूपी–कच्चे ोते. बहुतेक प्रोफेसर नालायक. त्या शिवाय मुलांना शिकवण्याचा त्रास ते घेत नसत. त्येकाला एकेक खोड. कोणी विद्यार्थ्यांचे चेहरे पाहून मार्क देई. कोणी त्यांच्या वडिलांना ाहून, कोणी त्याचा धर्म लक्षात घेऊन, तर कोणी त्यांची पोर्तुगीज भाषा बोलण्याची ढब ाहून. Conceito म्हणून एक प्रकरण होते. Conceito म्हणजे प्रोफेसराचे विद्यार्थ्याविषयी नवलेले मत. त्याला कोणताच आधार नसायचा. आराऊज माश्कारेन्यस या नावाचा एक

प्रोफेसर होता. तो पोर्तुगीज शिकवी. तो हिंदू मुलांना सर्रास विसापैकी चार मार्क त्याने ठरवून टाकले होते : हिंदू डुकराचे मांस खात नाहीत म्हणून त्यांना पोर्तु येत नाही. त्याने वर्गात उघड उघड सांगावे की डुकराचे मांस खाल्ल्याशिवाय पोर्तुगीज भाषा येणार नाही. लिसेवच्या सातव्या वर्षी तो माझा प्रोफेसर झाला. सिद्ध करून दिले की, डुकराचे मांस खाल्ल्याशिवाय मला पोर्तुगीज भाषा चांगल बोलता येते. इतकेच नव्हे तर परीक्षेत मी त्याच्याकडून distinction घेतले. मार्तीश हा चित्रकलेचा शिक्षक होता. तो कधीच शिकवीत नव्हता. वर्गात तो शि गोष्टी सांगायचा किंवा निर्लज्जपणाने अश्लील गोष्टी सांगायचा. संभोगशास्त्रात अनुभव तो आवडीने सांगायचा. मेसायश गोमीश हा एक बुटका सज्जन प्रोफे O' Heraldo नावाचे एक पोर्तुगीज दैनिक चालवायचा. त्याने कधी तोंड उघ पाहिले नाही. विद्यार्थी शिकले न शिकले, सगळे पास ! वर्गात तो सगळा ता लिहायचा. आगुश्त मोंतेर हा इंग्रजीचा प्रोफेसर. मोठ्या कष्टाने मॅट्रीक पास झा आम्हाला शेक्सपियरची नाटके शिकवायचा, म्हणजे वाचून दाखवायचा. त्यातले त्य कळत होते मला माहित नाही. आम्हा मुलांना मात्र काहीच कळत नव्हते. प्रो. सि एक हिंदू प्रोफेसर. दिसायला विलक्षण आणि स्वभावानेही विलक्षण. ख्रिश्चन प्रोफेसर असे त्याला पाहून आम्हाला वाटायचे. हिंदू मुलांना हिणवणे आणि ख्रिश्चन मुलांन धरणे एवढेच त्याचे काम. नसते चाळे करण्याची त्याला खोड. मुलाचा अभ्यास क हे समजून घेण्यापेक्षा त्याचे वडील काय करतात, तो ब्राम्हण की शुद्र, असल्या चांभार त्याला रस होता. असे किती नमूने म्हणून सांगायचे ? तात्पर्य, मुलांच्या अभ्यासा होई. बहुतेक विद्यार्थी शिक्षकावर विसंबून न राहता घरीच शिकत. मी तेच करी पुस्तके हेच माझे शिक्षक झाले होते. वर्गात वेळ जाई तो व्यर्थ जाई.

एका प्रसंगाची मला आठवण आहे. अराऊज माश्कारेन्यसला एकदा हुक्की त्याने प्रत्येक मुलाला विचारले, ' Voce o que quere ser ? ' (तुला काय आहे ?) कोणी म्हटले, आपल्याला प्रोफेसर व्हायचे आहे. दुसऱ्याने म्हटले डॉक्ट आहे, शेवटी माझी पाळी आली. माझ्यावर त्याचा डोळा होता. कारण मी पोर्तुगी धिटाईने बोलत होतो. त्याचप्रमाणे सफाईने लिहित होतो. माझी टिंगल करण्याच त्याने छद्मी स्वरात प्रश्न केला, " O Sr. Sar Dessai, O que quere s

शरदेसाई तुला कोण व्हायचे आहे ?) आणि हास्याचा एक फवारा सोडला. मी न घाबरता ांतपणाने आवाज चढवून म्हटले, ' मला लेखक व्हायचे आहे ! '. माझे अनपेक्षित उत्तर कल्यावर प्रोफेसराने चमकून म्हटले, 'Grande escritar hadu ser voce !' (मोठा खक होणार आहेस तू ! ')

काही वर्षानंतरची गोष्ट. एक कथाकार म्हणून माझी जिकडे तिकडे कीर्ती झाली. ाझी बरीच पुस्तके प्रसिद्ध झाली. माझ्या कथांचे अनुवाद इतर भाषांतून होऊ लागले. माझ्या शाचा सुगंध आराऊजाच्या नाकापर्यंत पोचला असावा. एक दिवस मी पणजीच्या रस्त्यातून ात असताना, 'सरदेसाई, सरदेसाई' असा आवाज माझ्या कानी आला. मान उचलून वर ाहिले आणि जवळच्याच घराच्या माडीवरून आराऊज मला साद घालताना दिसला. जिना ढून वरती गेलो. वीस वर्षानंतर माझी त्याची ही भेट. आराऊजने मला आलिंगन दिले आणि सद्गदित होऊन म्हटले, "तू मला क्षमा करशील ना ? आपले शब्द तू खरे करून ाखवलेस व प्रख्यात लेखक झालास. तुझ्या कथा पोर्तुगीज भाषेत अनुवादित करून मला ."

लिसेवच्या सात वर्षाच्या काळात मी लेखन–वाचन करून बरीच पुर्वतयारी केली होती. या काळात मी मराठी आणि पोर्तुगीज या दोन्ही भाषांत खूप लिखाण करून ते गोव्याच्या थानिक नियतकालिकांतून छापले. 'भारत' 'हिंदू', 'एराल्द, 'ऊ एराल्द' या नियतकलिकात ूप लेख लिहिले. पुण्याच्या 'केसरी'तही काही लेख प्रसिद्ध झाले. 'सौमित्र' या टोपणनावाखाली रेच लेखन प्रसिद्ध केले. एकदा 'प्रागतिक संघ' या राजकीय पक्षावर कडक टीका करण्याचा ाझ्यावर प्रसंग आला. त्यावेळचे राजकीय पक्ष अगदीच बेगडी होते. निवडणुकीसाठीच त्यांचे अस्तित्व होते. 'प्रागतिक संघ' हा हिंदूचा पक्ष होता. तोदेखील तेच काम करू लागला. उच्च रकारी अधिकाऱ्यांशी मैत्री करून निवडणूकित आपले उमेदवार उभे करणे आणि सरकारी ोरणाचा पुरस्कार करणे एवढेच हा पक्ष करी. ना ध्येय ना कार्यक्रम. सगळे पदाधिकारी रकारी नोकर. भित्रे नि परावलंबी. हेच लोक आमचे मानलेले पुढारी होते. मी वीस वर्षाचा ुलगा. लिसेव शिकणारा, पण आपले हे ज्येष्ठ लोक समाजाची दिशाभूल करतातत ते मला हन झाले नाही. प्रागतिक संघावर तीन झणझणीत लेख लिहून ते मी 'सौमित्र' या ोपणनावाने 'भारत' ह्या साप्ताहिकात छापले. प्रागतिक संघाचे कुठे चुकते आणि त्याने ाय केले पाहिजे ते सांगण्यासाठी माझ्या सारख्या मुलाला पुढे येऊन जाणत्या माणसाना ार्ग दाखवावा लागला. शांबाराव सरदेसाई हे त्यावेळचे एक विचारवंत पुढारी. गजानन

सावर्डेकर हे दुसरे. दोघेही एकत्र येऊन काही जागरणे करून प्रागतिक संघ या टोप
भारतातून माझ्या लेखाना त्यांनी उत्तर दिले. त्यात त्यांनी प्रागतिक संघाचे धोरण
धरले. त्यांच्या लेखांचा सारांश असा की गोव्याला कोणतेच राजकीय अधिकार मि
शिल्लक राहिले नाहीत म्हणून लोकऱ्यांचे राजकारण हेच आमचे मुख्य राजका
पाहिजे. शांबारावांचे हे विचार वाचल्यानंतर मला फार त्रास झाला आणि उपहास,
इत्यादी साहित्यिक अस्त्रांचा उपयोग करून मी त्यांच्या मुद्द्यांच्या चिंधड्या उडविल्य
दुसऱ्या एका शक्तीचा मला प्रत्यय आला. ती शक्ती म्हणजे थोरामोठ्यांची कदर न
तत्त्वासाठी भांडण्याची.



(दै. गोमन्तक रविवार पुरवणी, सप्टेंबर–ऑक्टोबर १९८१ (?) वरून साभार.

**टीप:** '**तृप्त मी फकीर मी**' या लक्ष्मणरावांच्या आत्मकथनाच्या प्रथम भागातून साभ
घेतलेला सुरवातीचा काही भाग. मूळ शीर्षक बदलून घेतले आहे. – **संपादव**

# लक्ष्मणोवाच



**साहित्य संमेलनातील अध्यक्षीय भाषण करताना...**

('लक्षदा', दिवाळी १९८६च्या सौजन्याने.)

" आपण जीवनाशी प्रामाणिक राहिलो तरच साहित्याशी प्रामाणिक राहू शकतो. "

**–लक्ष्मणराव सरदेसाई**

# DIRECTORATE OF EDUCATION
# PANAJI - GOA

MARCHING AHEAD TOWARDS THE ACHIEVEMENT OF

1. Implementation of Goa Compulsory Education Act, 1995.
2. Universalisation of Elementary Education 100% coverage.
3. Incentives to school going children (Primary level) in form of text books, free uniforms, Note Books, Raincoats etc.
4. Introduction of Computer Literacy Programme in all Seconda Higher Secondary Schools.
5. Equipping of Schools under the Operation Black Board Progr
6. Strengthening of Elementary Education.
7. Establishment of State Council of Education research and Tra
8. Qualitative improvement in school Complex Scheme.
9. Vocationalisation of Education.
10. Attainment of 100% literacy.
11. Implementation of Goa Library Act 1995.
12. Implementation of " Cyberage Student Scheme."
13. Implementation of Mid Day Meals Scheme.
14. Implementation of "Clean School Beautiful School" Project.
15. Implementation of Infrastructure Development loan scheme fo schools.
16. Implementation of Environment Education in school system a GLOBE Project.
17. Revised pattern of Assistance for village/Panchayat Libraries.

**Director of Educati**
Panaji - Goa.

# व्यक्ती तितक्या प्रकृती : लक्ष्मणराव सरदेसाई



**अभ्यासमग्न...**

(दै. गोमंतक रविवार आवृत्तीच्या सौजन्याने.)

| | | |
|---|---|---|
| **ंपूर्ण नाव** | – | लक्ष्मण श्रीपाद सूर्यराव सरदेसाई |
| **रिवारातील लाडके नाव** | – | घरच्या परिवारात 'काका', आजोळच्या परिवारात 'भाऊ' |
| **न्म तारीख** | – | गावच्या पुरोहिताची नोंद : फाल्गुन वद्य अमावास्या, सूर्यग्रहण, शनी--राहू इ. दुष्ट ग्रहांची कृपा. सरकारी दप्तराची नोंद : १८ मार्च १९०४. |
| **ावडता रंग** | – | नजरेसमोरच्या सुंदर बाईच्या अगकांतीला 'मॅचिंग' कापडाचा रंग |
| **ावडता लेखक/ लेखिका** | – | १. आल्बर्ट कामू, २. विश्राम बेडेकर |
| **याचा /तिचा आवडता ग्रंथ** | – | १. द आउट साइडर, २. रणांगण |
| **ावडता कलाकार** | – | लता मंगेशकर |
| **याची आवडती कलाकृती** | – | भूपाळी : घन:श्याम सुंदरा.. |
| **ावडता खेळ/छंद** | – | बालपणात पोहणे व शिकार, तरूणपणात स्वातंत्र्यसंग्राम व म्हातारपणात चिंतन. |

| | | |
|---|---|---|
| **माझा आनंद** | – | अनाथांचा आनंद हाच माझा आनंद |
| **माझे दु:ख** | – | अनाथांच्या दु:खात माझे दु:ख |
| **माझे प्रलोभन** | – | स्त्री सौंदर्य–निसर्ग सौंदर्य |
| **माझी रुखरुख** | – | आयुष्यात पुंजी केली नाही. त्यामुळे म्हातरपणी लागणाऱ्या अडचणी आणि गरजवंताना गुप्तदान असमर्थता. |
| **माझा संताप** | – | दुबळ्यावर होणारा अन्याय. |
| **माझे गुपित** | – | ते फोडले तर काही जीव त्रासात पडतील. असले गुपित आज गुपित राहिलेले कलाकाराच्याबाबतीत तर नाहीच नाही. |
| **माझे वैशिष्ट्य** | – | मी प्रिमिटिव्ह इंस्टिंक्टचा माणूस आहे म्हणून प्रेरणांप्रमाणे वागणारा. |
| **माझं वैगुण्य** | – | व्यवहाराशून्यता. |
| **माझा संस्मरणीय क्षण** | – | चि. डॉ. मनोहर सरदेसाई ह्यांच्या 'जायो जु काव्यसंग्रहाचे वाचन. |
| **माझा भ्रमनिरास** | – | भ्रमाच्या जगात सतत वावरलो म्हणून भ्रमनिरा नाही. |
| **माझी श्रद्धा** | – | मूर्तीतील देवत्वावर नाही. एकाच परमेश्वरी आणि निष्ठावंताच्या खऱ्या श्रद्धेवर. |
| **माझे जीवनविषयक तत्त्वज्ञान** | – | माणसाने स्वत:चे कल्याण आणि इतरांचे सुख साधण्यासाठी विरोधी परिस्थितीशी सतत साम राहणे. |
| **वाचकांना संदेश** | – | स्वार्थ व परमार्थ यांचा समन्वय साधा. |

**पणजी, २८ -६- १९७८** लक्ष्मणराव सरदेसा

(दैनिक गोमन्तक, रविवार पुरवणी १९८१ (?)वरून स

# उपरती आणि निर्मिती

– **लक्ष्मणराव सरदेसाई**

वार्धक्य कानाशी अधिकाधिक गुजगोष्टी करू लागते, तसा मी जुन्या आठवणीच्या ळसर डोहात डुंबत राहतो. बालपणात मी वर्तमानकालाशी तद्रुप होऊन गेलो होतो. रूणपणात भविष्याकडे नजर लागली होती. आता वार्धक्यात पुन्हा बालपणात म्हणजे तकाळात डोकावून पाहत आहे. बहुतेक वृद्धांची बावरी नजर मृत्यूवर खिळलेली असते. ला मृत्यूची धास्ती वाटत नाही. कारण मन निर्भय बनलेले असल्यामुळे जीवावरच्या कतीतरी प्रसंगाना मी सामोरा गेलो आहे. पुर्नजन्माचे आकर्षण वाटत नाही. बालपणात, ढावस्थेत आणि तारूण्यात, कळत वा नकळत, हातून घडलेल्या चुका मनात गर्दी करतात हुरहुर माजते. त्या चुका सुधारणे आता शक्य नाही, ही जाणील बोचू लागते आणि ामुळे अुत्पन्न होणाऱ्या अनुतापात मन निवारा शोधू लागते. आणि त्या निवाऱ्यातच माझ्या र्मितीला खतपाणी मिळते.

बालपणात आपण कसल्यातरी घाईत, गडबडीत असतो. आसपासच्या साध्या घडामोडी, ल्लक प्रचंड बरीवाईट दृश्ये आपले मन वेधून घेतात आणि भोवतालच्या धावपळीत, नाच्या लगबगीने सामील होअून आपण स्वत:लाच विसरून जातो. भावनांच्या अमूर्त गाकडे लक्ष पुरवायला आपणास त्यावेळी जणू फुरसत नसते. गावचा तलाव, पक्षाची ाकार, मैदानातील खेळ आणि नाना सवंगडी यांच्या जगात आपण इतके रमून गेलेलो सतो की आपल्या मायेच्या माणसाचे अस्तित्व देखील आपल्याला जाणवत नाही, इतर लांच्या बाबतीत मात्र वरील नियम खरा आहे.

माझ्या थोरल्या बहिणीची – अक्काची मला कधी कधी आठवण येते. मी दहा वर्षाचा सतानाच्च ती वारली. तिला माझा अतोनात लळा होता. तेवढाच तिच्या बाबतीत मी दासीन होतो. मला आनंदी ठेवण्याकरता ती जिवाचा आटापिटा करी आपला खाऊ आईला कळत मला आणून देई. मी कितीही दंगामस्ती केली तरी आईवडिलांपाशी कधी तक्रार ऊन जात नसे. माझ्या चुगल्या करीत नसे. बाबा रागे भरले व मला मार देण्याच्या तयारीत सले तर, मला एकाद्या सुरक्षित जागी लपवून ठेवी. मला मार बसला तर मुळूमुळू रडू लागे. णेशचतुर्थीच्या सणानिमित्त लोकानी तिला दिलेले फटाकडे हळूच माझ्या पिशवीत ठेवून देई. ायेच्या ह्या मोबदल्यात माझ्याकडून तिला मिळे ती उपेक्षा, निर्भत्सना. तिच्या हाताचा स्पर्श खील मला खपत नसे. तिचे कपडे हाताला लागले तर मी फेकून देई. तिचा हिरमोड रण्याची संधी मी गमावीत नसे. मी असे का करीत असे याचा अजून मला उलगडा होत ाही. वयाच्या चौदाव्या वर्षी ती विषमज्वराने वारली. तेव्हा मला फारसे दु:ख झाल्याचे

आठवत नाही, पण आज साठ वर्षाच्या काळानंतर, तिच्या मायेचे नाना प्रकार अ आणि मन बेचैन होते. वाटते, पुढच्या जन्मी (पुर्नजन्म असला तर) तिचा भाऊ होउ सेवा करावी. भावनांचे जग त्यावेळी मलाच का पारखे व्हावे आणि माझ्या सुखाच्या माझी अक्का मात्र एवढी जागरूक का असावी ? या गोष्टीचा उलगडा होत नाही. होतो असेही नव्हे. सोबत्यांचा मी आवडता होतो. अभ्यासात व इतर कामात त्यां करताना मला आनंद होई. घरच्या इतर माणसांची कामे मी तत्परतेने करीत अ अक्काशी संबंध आला की तुसडा होई. माझ्या हातून घडणाऱ्या घोर अपराधा जाणीव नसे. तिने माझ्यावर प्रेमाचा वर्षाव करावा आणि मी मात्र तिची अवहेलन यात मला अस्वाभाविक असे काहीच दिसत नसे. आज वार्धक्याच्या अखेरच्या पर्वा करीत असताना अक्काची मन:स्थिती लक्षात घेऊन मला गहिवरून येते आणि गांजलेल्या व आपल्याच प्रिय माणसांच्या उपेक्षेचा, उपहासाचा विषय झालेल्या बायका मला अक्का दिसू लागते. तसा मी त्यांच्याकडे ओढला जातो आणि अपार करूण माझ्या भोवती घुमू लागतात.

वडिलांच्या बाबतीतही माझ्या हातून असाच गुन्हा घडला आहे असे अलीक वाटू लागले आहे. जुन्या काळच्या खानदानी घराण्यातील पुरूष जुगाराच्या नादा असत. तत्कालीन समाजात हे दूषण मानले जात नसे. माझे वडिल जुगारी होते प्रपंचाच्या सुखस्वास्थाबद्दल ते बरेच बेफिकीर होते. त्यांची माया माझ्या वाट्याला थोडी आली. त्यामुळे माझी बरीच आबाळ झाली. विशेषत: भावनांच्या बाबतीत बऱ्याच आवडी अपुऱ्या राहिल्या. माझ्या आईला देखील असाच उपसर्ग झाला. याचा असा झाला की मी मनातल्या मनात कुढत राहिलो, वृत्तीत कढवटपणा शिरला. म समजून घेण्याची गरज बाबाना कधीच भासली नाही. माझ्यावर त्यांचे प्रेमही नव्हते नाही, पण बायको–मुलाचे सुख हे त्यांच्या कर्तृत्वाचे मुख्या उदिष्ट कधीच झाले त्यामुळे आमच्यामध्ये नकळत दुरावा अुत्पन्न झाला. माझ्या आवडी निवडी त्यांच्या घालण्याची संधी मला कधीच मिळाली नाही. माझी सुखदुखे, आशाआकांक्षा माझ्या विरल्या. माझ्या वयाच्या तेराव्या वर्षी आई तापाच्या साथीला बळी पडली. बाबाने लहान माझे लग्न उरकून घेतले. मुले बाळे झाली. जे प्रेम मला बाबाकडून मिळाले नव्हते ते आपल्या नातवंडाना दिले. त्यांच्या खूप खस्ता खाल्ल्या, त्यांचे आजार उपसले. मुलाला तर त्यांनी खूप माया दिली. पण मी मात्र त्यांच्याबाबतीत ऊदासीनच राहिलो. दोघामध्ये सख्य निर्माण होऊ शकले नाही. बाबाना उतार वयात आपली चूक कळून तेव्हा माझ्याबद्दल ते फारच आस्था दाखवू लागले. पण तशाच भावनेचे (प्रतिसाद) त्यांना माझ्याकडून मिळू शकला नाही. त्यांचा मी तिटकारा करीत होत

. पण लहानपणापासून माझ्या मनाची व देहाची त्यांच्याकडून हेळसांड झाली होती, ती या मनात साचली असावी आणि त्यामुळे ऐकप्रकारची उपेक्षा तेथे रूजली असावी. ांना कधी दुरुत्तर केल्याचे मला आठवत नाही. त्यांचा पाणउतारा माझ्या हातून कधी ा नाही. वागणुकीत बेअदबी आली नाही, पण माझी अनास्था त्याना जाचक होत ावी. त्यांची प्रकृती खालावली आणि ते आजारी पडले, तेव्हा आपली नाजूक व्यथा त्यांनी ल्या सुनेपाशी उघड केली, पण त्यांच्या हातून घडलेल्या प्रमादाकडे क्षमाशील दृष्टीने न त्यांच्याशी मोकळ्या मनाने वागण्याचा प्रयत्न माझ्या हातून झाला नाही. माझ्या ीच्या एका मोठ्या आजारात, मुलांच्या दैनंदिन संगोपनात त्यानी खूप कष्ट उपसले. याबद्दल प्रेम व आदर वेळोवेळी व्यक्त करण्याइतके त्यांचे मन पश्चातापाने पोळले होते गोष्ट लक्षात घेऊन त्यांच्याबद्दल सहानुभूती दाखवण्याचे साधे कर्तव्य मी पार पाडू शकलो ी. ही जाणिव आज मला त्रासदायक होत आहे. बाबापाशी बसून मोकळेपणाने बोललो तो, त्यांनी विचारलेल्या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे दिली असती, त्यांनी मला न ली जवळिक मी त्यांना दिली असती तर त्यांच्या मनाची जाचणी हलकी झाली असती; मी माझ्या नादात, छंदात इतका दंग होतो की बाबांच्या मनाचा, भावनांचा विचार रपणे करायचे मला कधी सूचलेच नाही.

दुसरी एक आठवण मला त्रस्त करते ती माझ्या चुलतीची – आतेबाईची.

माझ्या लहानपणी आतेबाई माझे फार लाड करायची. माझा ब्राच वेळ तिच्या खोलीत ाचा. ती माझ्याशी तासन्तास गप्पा गोष्टी करायची. माझी आई वारल्यानंतर, तिला माझा च लळा लागला. इतका की काही घरगुती गोष्टीत देखील माझ्या बालवयाकडे दुर्लक्ष न ती माझा सल्ला घ्यायची. आमच्या सामाईक घरात माझी पत चांगली होती. शांत, यासू, विचारी मुलगा म्हणून घरची माणसे मला ओळखत. वयाच्या विसाच्या वर्षी काळच्या पद्धतीप्रमाणे मला मुली सांगून येऊ लागल्या. सून घरात आणण्याचा विचार ल करू लागले. तेव्हा आतेबाईनी खटपट करून आपली भाची आमच्या घरी आणली.

जेवणाच्यावेळी एक दिवस कसल्याशा क्षुल्लक कारणावरून आमच्यामध्ये खटका ला. एवढे निमित्त तिच्याशी अबोला धरायला मला पुरेसे झाले. तिच्या हयातीत आम्ही मेकांशी बोललो नाही. आतेबाईशी संबंध तुटल्यासारखाच झाला. ही गोष्ट तिच्या मनाला च लागून राहिली. आपल्या वयाच्या पंचेचळीसाव्या वर्षी ती टायफॉडने वारली. मी वेळी फोंडा येथे आलूमैदा कॉलेजचा मुख्याध्यापक होतो. जवळजवळ पंधरा वर्षे आमचा ोला चालू होता. तिच्या शेवटच्या दुखण्यात मी घरी गेलो तेव्हा ती मृत्यूशय्येवर पडली ी.

माझ्या थोरल्या मुलाच्या बाबतीतही माझ्या हातून हाच अपराध घडलेला आहे. जुन्या

काळी मुलांशी वागण्याची पद्धत विलक्षण होती. मुले व वडील यांच्यामध्ये एक पारद उभी होती. माझ्या वागणुकीचे हे एक कारण असू शकेल, पण खरे कारण म्हण आत्मकेंद्रित वृत्ती. मनोहर हा गाढ भावनेचा मुलगा. अंतर्मुख वृत्तीचा. बराच अबोल भावना शब्दातून क्वचितच व्यक्त करणारा. अभ्यासू व कष्टाळू. मोठंमोठी स्वप्ने ब त्याच्या साध्या आवडीनिवडी समजून घेऊन त्या मला सहज पुऱ्या करता आल्या अ तिकडे माझे दुर्लक्षच झाले. त्याला मी वाईट वागणूक दिली असं नव्हे पण घरात खे मोकळे पणाचे वातावरण निर्माण करून दिले नाही. त्याने खूप खूप शिकावे, पुरूषा त्याच्या हातून काहीतरी असाधारण घडावे असे मला मनापासून वाटत होते. तर उपदेशही मी करीत असे, पण त्याच्या भिरू व हळुवार मनाची दखल घेऊन अडचणीत सहभागी होऊन त्याच्याभोवती आनंदाचे, उत्साहाचे, धीराचे, वातावर करून त्याला व्यवहाराच्या जगात एकाकी वाटू नये म्हणून प्रयत्नशील राहून त्याच्या विकासात मी पद्धतशीरपणे हातभार लावू शकलो नाही. त्याच्या कर्तृत्वाच्या आड नाही हे खरे पण त्याच्या विद्यार्थीदशेत व नंतरही त्याचा सतत पाठपुरावा करीत प्राथमिक कर्तव्य माझ्या हातून पार पडले नाही. कदाचित वडिलांची जुगारी वृत्त पिंडात उतरली असेल, मी जुगार खेळलो नसेन पण एकप्रकारचा बेभानपणा, माझ्या वृत्तीत निश्चित होती. ती धुंदी साहित्याच्या क्षेत्रात दिसली, तशीच स कार्याच्या क्षेत्रातही दिसली. स्वातंत्र्यसंग्रामात दिसली. संग्रामकाळात मी संसार विसर त्याचप्रमाणे साहित्य निर्मीतीकडेही माझे दुर्लक्ष झाले होते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पुन्हा उपस्थित झाले. त्यानी माझ्यावर झडप घातली. गोव्याच्या विलिनीकरणाचा प्रश्न हा ऐक होता. माझी पाचसहा वर्षे त्याच प्रश्नात, विलिनीकरणविरोधात व्यतीत झाली. थ सांगायचे तर असे, की माझ्या आयुष्याच्या वेगवेगळ्या टप्प्यात कोणत्या तरी प्रबळ मला झपाटले होते मला आलेले झटके घरच्या माणसाना बाधले ; पण मनोहरला बाधले.

इतर मुलांच्या बाबतीतही हा दोष दिसून आलाच. तसे पाहिले तर मी कथाक संवेदनांचा, हळुवारभावनेचा पण वडील आणि मुले यांच्यामधील सख्याला माझ्या मन थोडे स्थान मिळाले. मी स्वयंकेंद्रित होतो असेही म्हणता येत नाही. इतरांच्या सुखा नेहमीच जागरूक होतो. माझी कळकळ त्यांना जाणवत असें. पण स्वत:च्या कु माणसांच्या आणि विशेषत: आपल्या पोटच्या अपत्याविषयी मात्र मी निर्विकार बनत माझ्या ह्या वागणुकीचा परिणाम त्यांच्या मनाच्या घडणीवर झाला असल्यास नवल

ह्या व इतर काही आठवणी मला कधीकधी जाचक होत असतात. माझे बरेच आज ओसरले आहेत. अहंकार निमाला आहे. उपरतीमुळे अंतरंग शुद्ध होत चाल

नकेच नव्हे तर अपराधाच्या जाणिवेनेच माझ्या सृजनशीलतेला धार येत आहे. sense of ilt हीच माझी शक्ती झाली आहे. माझ्या स्वभावदोषामुळे जे घडले ते घडून चुकले आहे ाचा उपयोग माझ्या आंतरिक समृद्धीकडे होत असला तरी माझ्या मुलांना जे सोसावे गले त्याचे काय? ह्या प्रश्नाला माझ्यापाशी उत्तर नाही.

+ + +

ा. रवींद्र घवी यांच्या खाजगी संग्रहातून उपलब्ध झालेल्या अप्रकाशित हस्तलिखित खाच्या छायामुद्रणावरून, साभार.)


STATEMENT ABOUT OWNERSHIP AND OTHER PARTICULARS ABOUT NEWSPAPER "APARANTAK" TO BE PUBLISHED IN THE FIRST ISSUE EVERY YEAR AFTER THE LAST OF FEBRUARY

**FORM - IV**

(SEE RULE- 8)

| | | | |
|---|---|---|---|
| 1. | Place of Publication | : | Pernem - Goa. |
| 2. | Periodicity of its Publication | : | Monthly |
| 3. | Printers Name | : | Shri. G. D. Kanolkar |
| | Whether citizen of India if foreigner, state the country of origin | : | Yes |
| 4. | Address | : | 468/10, Murmuse, Tuem Pernem - Goa. 403512 |
| | Whether citizen of India if foreigner, state the country of origin | : | Yes |
| 5. | Editor's Name | : | Dr. Balkrishnaji Kanolkar |
| | Whether citizen of India if foreigner, state the country of origin | : | Yes |
| 6. | Address | : | S-2, 2nd Floor, Sharada Apts., Opp. ID Hospital, Tisk Ponda, Goa. 403401 |
| 7. | Name & Addresses of Individuals who own the Newspaper and partners or shareholders holding more than one percent of the total capital | : | 468/10, Murmuse, Tuem Pernem - Goa. 403512 |

I, G. D. Kanolkar, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief

Date: 01. 03. 2004 Signature of Publisher

# ' कथाशिल्प ' वेंचे

**प्रस्न:** : **प्रोफेसोर, तुमची जल्म भास कोंकणी. तुमी शिकले पुर्तुगेज. पुर्तुगेज बरी जाल्लो गोंयकार म्हण तुमची नामना. मागीर, बरोवपाक लागले तेन्‍ ह्यो दोनूय भासो सोडून मराठीच-शी कित्याक वेंचून काडली?**

**लक्ष्मणराव** : पुर्तुगेज एक सुंदर भास. म्हाका ती बरी येताली. इतलें आसून म्ह परकी दिस ऽ. मराठी पुर्तुगेजी परस लागींची दिस ऽ. आमच्या संस्कार तशे जाल्ले. आमचे मुस्तितले सगळे बरपी मराठींत बरयता गोंयबाबांच्या वावराचें म्हत्व त्यावेळार म्हाका समजूंक नाशिल्लें. आनी गोंयकार आनी आमचो उद्धार हांच्या मजगतच्या संबंदाचो वि करुंक नाशिल्लो. मराठी हाताकडेन मेळूळी. तिचोच उपयोग हांव लागलो. मराठी मेळुंक नाशिल्ली जाल्यार एकाद्रो हांव पुर्तुगेजींत ब आशिल्लो. आनी मराठी इतलेंच बरें बरयतलो आशिल्लों. कोंकणी जल्मभास. कोकणीत बरयल्याबगर भासूय वाडची ना आनी आमीय नात हो विचार तुमचे पिळगेन उबारून धल्लो. हांव कोंकणीत लागलो खूप उसरा म्हळ्यार १९५० सालांत. मुंबय रावंक वतकच. आकाशवाणी, 'प्रजेचो आवाज', 'साद', 'साळीक' बी मुंबयतली नेमाव खातीर बरोवंक लागलों. आनी ती बरोवंक लागतकच म्हाका तिची लागली. आनी तुमी-आमचे नवे पिळगेन सुरू केल्ल्या घडवणिच्या म्हत्व म्हाका कळूळे तेन्नाच्यान हांव कोंकणीचो भक्त जालां. तुमीं तिचो पाखो घेवन हांव वेगळ्या-वेगळ्या प्रसंगां(र) मराठी लोक झगडलांय.



(' **कथा शिल्प** ' ह्या पुस्तकातली '**कथेची साधना**' ह्या **भौ. रवींद्रबाब केळा** हांणी लक्ष्मणरावांच्या घेतिल्ल्या मुलाखतीतली वेंचिका; प्रकाशकाचे बरें मागून

# प्रत्यक्षात येऊ न शकलेले प्रत्यक्ष

(नियोजित मुलाखतीचे टीपण)*

**प्रश्न**

१] तुमचं आडनाव सरदेसाई, ते तुम्हाला कसं मिळाले?

२] तुमचं घराणं मोठं, सरदारी याबाबतीत तुमच्या लहानपणातल्या काही आठवणी सांगू शकाल काय ?

३] नारायणरावांनी कमावलेली इस्टेट तुमच्या लहानपणी अगदीच रोडावली होती असं तुम्ही कुठेतरी लिहिल्याचं आठवतं. याबाबतीत काही स्पष्टीकरण करू शकाल काय ?

४] लहानपणी खानदानीच्या कोणत्या खूणा किंवा अवशेष तुम्हाला पहायला मिळालेत ?

५] तुमचं आजोळ वाडी-तळावली, प्रतापराव सरदेसाई यांच्याकडे. तेथे तुमची काही वर्षे गेली असतील. तिकडचे अनुभव तुम्हाला आठवतात काय ?

६] पोर्तुगीज शिक्षणासाठी तुम्ही पणजी येथे जाऊन राहिलात. सहा-सात वर्षे तेथे काढलीत. तुमच्या पोर्तुगीज कॉलेजचे प्राध्यापक, प्रमुख सार्वजनिक कार्यकर्ते यासंबंधी तुमचे अनुभव कोणत ?

७] धन्वंतरी दादा वैद्य यांच्यासंबधी तुम्ही बऱ्याच ठिकाणी कमी अधिक लिहिलंत. दादांच्या बाबतीत थोडे सांगू शकाल काय ?

८] लिसेवचा कोर्स पुरा झाल्यावर तुम्ही कोणता व्यवसाय पत्करलात ?

९] पणजीला असताना तुम्ही वाचन-लेखन केलं असेलच. याबाबतीत थोडं सांगा.

१०] लिसेवचा कोर्स पुरा केल्यानंतर तुम्ही शिक्षकाच्या व्यवसायात पडलात. हे तुमच्या घरच्या माणसांना पसंत होतं काय? सुखस्वास्थ्यांची नोकरी सोडून तुम्ही शिक्षकाचा पेशा पत्करला. वीस वर्षे या व्यवसायात घालविली. फोंड्याच्या आलमैदा कॉलेजमध्ये दहा बारा वर्षे मुख्याध्यापक म्हणून काम केलत. विद्यार्थ्यांच्या जगात तुम्हाला आलेले काही अनुभव सांगा. याच काळात तुम्ही कथालेखनास सुरूवात केलीत. त्यापूर्वी तुम्ही लेखन करीत होतां काय ? कोणत्या भाषेत ?

११] सुरवातीच्या कथांच्या बाबतीत तुम्हाला आलेले कडू-गोड अनुभव सांगा.

१२] तुमचं लग्न आणि कुटुंब याबाबतीत थोडं सांगा. १९६१ साली पुण्याच्या 'यशवंत'

मासिकाने कथांची एक स्पर्धा लावली होती. तिच्यात तुम्ही यशस्वी झालात. या
जरा अधिक विशेष माहीती द्या.

१३] पहिल्या अवस्थेतील तुमच्या कथांचे गोव्यात आणि महाराष्ट्रांत स्वागत क
झाले ?

१४] १९३० ते ४० हा काल कथालेखक या नात्याने तुमच्या पहिल्या अवस्थेचा. या
तुमचे किती संग्रह प्रसिद्ध झाले ? प्रादेशिककथाचे प्रवर्तक म्हणून तुमचा त्यावे
गबागबा झाला. या बाबत तुम्ही कही विशेष सांगू शकाल काय ?

१५] १९४६ साली डॉ. लोहियाच्या आगमनानंतर तुम्ही गोव्याच्या स्वातंत्र्यसंग्रामा
घातलीत. हे कस काय घडलं ? स्वातंत्र्यसंग्रामात तुम्ही प्रत्यक्ष असं कोणत
केलंत ?

१६] ऑक्टोबर १९४६ मध्ये तुम्ही पणजीला भाषणबंदीचा कायदा मोडून सत्याग्रह
त्याबाबतीत थोडं विस्तारान सांगा. आग्वादच्या तुरूंगात तुम्ही वर्षभर राजबंदी
राहीलात. तेथील अनुभवासंबंधी बोला.

१७] स्वातंत्र्यसंग्रामातील वेगवेगळ्या अनुभवाचा कथालेखक या नात्याने तुम्हाल
फायदा झाला ?

१८] १९४९ साली तुम्ही मुंबईला गेलात. मग काही वर्षे मुंबईत तुमचे वास्तव्य झ
कालखंडात तुमच्या हातून कोणते साहित्यकार्य घडले ?

१९] संग्रामाचे कार्य काय घडले ?

२०] १९५९ साली तुम्हाला दिल्लीला जावे लागले. नभोवाणीवर. तेथे पाच वर्षे तुम्ही
त्या काळात तुमच्या हातून घडलेल्या कार्याची माहिति सांगा ?

२१] तुम्ही आपल्या जागेचा राजीनामा देऊन मुंबईला आलात. नंतर गोव्याला
गोव्यात आल्यावर तुम्ही कोणते कार्य हातात घेतलेत ? लेखन चालू होते का

२२] कोंकणी लेखनाकडे कधी वळलात ? का वळलात ? कोणते साहित्य प्रसिद्ध

२३] १९७९ (१९७७-७८) साली तुम्ही गोमंतक साहित्य संमेलनाचे अध्यक्ष
त्याबद्दल विशेष माहिति सांगा.

२४] तुर्त काय लेखन चालले आहे ? आज सुख स्वास्थ्याच्या दृष्टीने तुम्ही क
परिस्थितीत आहात ?

# नभोवणीसाठी – प्रश्नांची उत्तरे :

चार शतकापूर्वी आम्ही आमोणेगांवचे कुलकर्णी होतो. नारायण कुलकर्णी हे आमोणकरपैकी होते. ते गावात कुलकर्णीपद चालवित पण वृत्तीने साहसी अन् कर्तबगार असल्यामुळे त्याचे मन गावात रमेना. म्हणून नशीब उघडण्यासाठी (काढण्यासाठी) एका मराठा मित्राच्या सोबतीने गोवा सोडून ते विजापूरला गेले. तेथे अदिलशहाची कारकीद चालू होती. नारायण कुलकर्णीने दरबारात प्रवेश मिळविला. आणि लढाया मर्दुमकी गाजवून अदिलशहाकडून 'सूर्यराव सरदेसाई' हा किताब मिळविला. म्हणूनच आमच्या घराण्यात मूल जन्माला आले की ते 'राव' बनते आणि मरेपर्यंत त्याला हा किताब चिकटून रहातो.

आमचं घराणं मोठं, सरदारीं, खानदानी वगैरे सारं काही होतं. परंतु माझ्या जन्माच्या वेळी घराण्याचे वैभव ओसरले होते. घराण्याचा सांगाडा तेवढा होता. आमचे कुटुंब सामायिक. माझ्यावेळी ते फुटून त्याची दहाबारा बिऱ्हाडे वेगळी झाली होती. बहुतेक बिऱ्हाडांची परिस्थिती ओढाताणीची. जमिनी आणि इतर वैभव विपूल असल्यामुळे घरचे पुरूष सुखासीन ऐदी आणि आळशी बनले होते. त्यांच्या रिकामटेकडेपणामुळे घरात व्यसने शिरली होती. त्यापैकी जुगाराचे व्यसन हे एक. दुसरे बाहेरख्यालीचे. ह्या दोन व्यसनांमुळे घराण्याच्या वैभवाला गळती लागली होती. काही शतके हे विध्वंसनाचे काम चालूच राहिले. आणि या शतकाच्या सुरवातीला त्याची परिणती झाली.

वैभव नाममात्र राहिले होते. पण वैभवाचे अवशेष मात्र भरपूर दिसत. ते मी पाहिले आहेत. घर तीन अंगणाचे. एक मोठी सदर. तेथे 'गणेशोत्सव' मोठ्या थाटाने साजरा होई. तेथेच आश्विन नवमीला शेकडो जुन्या शस्त्रांस्त्रांची पूजा होई आणि बकऱ्याचा बळी देण्यात येई. शिमग्याचे मेळ प्रथम आमच्या आंगणात (अंगणात) नाचत. देवळातल्या काल्या–जत्रेच्यावेळी वाद्यांसह मशाल घेऊन आमच्या घरी येत. आणि खाशांना बरोबर घेऊन देवळाकडे जात. मग काला सुरु होई. चैत्र दशमीला घराण्याच्या पुरुषाचा गावकरी टिळा लावून आणि नारळ देवून सन्मान करीत. लहान–मोठ्या प्रत्येक देसायाला गावात लोक खासे म्हणत. तात्पर्य, वैभव गेले असले तरी वैभवाच्या असल्या निरर्थक खूणा शिल्लक राहिल्या होत्या. कर्तबगारी गेली होती. पण खोटा अंहकार, खोटी प्रतिष्ठा, घराण्याच्या पुरुषात ठाण मांडून

बसली होती. वैभव आटले होते. तेव्हा त्याचा उपभोग घेण्याचा प्रश्न प्रतिकूल परिस्थितीचा तडाखा माझ्या पिढीतील मुलांना बसला तेव्हा ती जागी झाली. आणि आत्मोद्धाराच्या मार्गाला लागली.

माझं आंजोळ वाडी येथील प्रतापरावांच्या घरी. म्हणजे घर आणि दोन्ही बाजूनी मी सरदेसाई. एका बाजूने 'सूर्यराव' तर दुसऱ्या बाजूने अशा सूर्यप्रतापाच्या संगमातून मी निघालो. त्यामुळे प्रतापी झालो असे हरकत नाही. माझ्या लहानपणी माझ्या घरच्या व आजोळच्या पुरुषां शुल्लक विषयावरून कलह माजला होता असे मला आठवते.

विषय असा की, तुम्ही श्रेष्ठ की आम्ही श्रेष्ठ? आजोळचे म 'प्रतापराव सरेदसाई' हेच खरे सरंदेसाई. माझ्या घरची माणसे म्हणत क सरदेसाई' हेच खरे सरदेसाई. हा वाद चालल्यामुळे इतरांच्या लग्नसमारंभात व विघ्न उपस्थित होई. जेवणाच्या पंक्तीत कोणत्या सरदेसाईला पहिल्या पानाव हा एक चिंतेचा विषय 'वऱ्हाडी' माणसांना होऊन राही. असल्यां शुद्र आमची आणि प्रतापरावांची वडिलधारी माणसे रमत. मी आजोळी गेल तिकडची माणसे मला आमच्या घराण्याची टिंगल करून नाना प्रश्न विचा

६) मराठी वा (व) पोर्तुगीज प्राथमिक शिक्षण झाल्यावर मी पुढच्या शिक्षणासाठी जाऊन राहिलो. त्यापूर्वी १९१८ सालच्या तापाच्या साथीत माझी आई व अ वारली होती. त्यामुळे मला एकाकीपणा फारच जाणवत होता. वडील जुगारी नि ते मला तेवढी माया ममता देऊ शकत नव्हते. अशा मानसिक अवस्थेत अ मला पणजीला जावे लागले. तेथे अभ्यासाबरोबरच मी मराठी, पोर्तुगीज वा ठेवले. वयाच्या १४व्या वर्षापासून मी पोर्तुगीज, मराठी हजारो पुस्तके वाचू असतील. त्यामुळे मराठी व पोर्तुगीज या भाषात मी लेखन करू शकलो. तत्कालीन पोर्तुगीज, मराठी नियतकालिकांतून टोपणनावाने प्रसिद्ध होत. प्रोफेसर फार थोडे शिकवीत. गप्पा, गोष्टी करण्यातच वेळ घालवीत. काही शिकारीच्या अनुभवाचे वर्णन करीत. काही आपल्या बाहेरख्यालीचे मोठ वर्णन करीत. आम्हा मुलांना हे सारे गपचूप (गुपचूप) ऐकून घ्यावे ला एखाद्या हुशार विद्यार्थ्याने आपला निषेध व्यक्त केला तर त्या बिचाऱ्याला व देऊन प्राध्यापक त्याचे वर्ष वाया घालवीत.

७) त्यावेळी पोर्तुगीलात १९१० साली लोकशाहीची स्थापना झाली आणि तिचे पडसाद गोव्यात उमटू लागले. हिंदू समाज हा त्यावेळी दलित समाज होता. राजदरबारात तिला (त्याला) महत्त्व नव्हते. पोर्तुगीज शिक्षणात हिंदूंची प्रगती झाली नव्हती. त्यामुळे नोकरशाहीच्या चौकटीत त्याचा प्रवेश फार थोडा झाला होता. अशा काळात हिंदूंनी 'भारत', 'हिंदू' यासारखी नियतकालिके सुरू केली. आणि पोर्तुगीज शिक्षणाचे हिंदू पदवीधर समाजाच्या उत्कर्षासाठी झटू लागले. काही नावे मला आठवतात. डॉ. आत्माराम बोरकर, डॉ. शिरगावकर, व्यकंटेशराव सरदेसाई इत्यादि.

८) धन्वंतरी दादा वैदय यांचा मी लहानपणापासून मोठा चाहता. त्याकाळातले ते एक फार मोठे पुरूष होऊन गेले. वैद्यक, शिक्षण, साहित्य, उद्योगधंदे, संस्कृती अशा वेगवेगळ्या क्षेत्रात त्यांनी फार मोठे कार्य केले होते. मी फोंड्याला गेलो तेव्हा दादा वैद्यांनी मला वर्षभर आपल्या घरी ठेवून घेतले. 'आलमैदा कॉलेज' ह्या त्यांनी स्थापलेल्या पाठशाळेत मी शिकवू लागलो. १९५० साली मी केसरीत दादांचे व्यक्तीचित्र लिहून प्रसिद्ध झाले (केले).

९) लिसेवचा कोर्स पूरा केल्यानंतर मी सरकारी नोकरी न पत्करता 'आलमैदा कॉलेजा'त'शिकविण्याचे काम करू लागलो हे घरच्या मंडळीना मुळीच आवडले नाही कारण त्यावेळी पोर्तुगीज शिक्षण संपादन केलेली बहुतेक सर्व मुले नोकरशाहीत शिरत. मला ते आवडत नव्हते. पोर्तुगीजांनी गोव्याच्या जनतेवर इतिहासकालात केलेले अत्याचार मला नेहमीच अस्वस्थ करीत आले होते. त्यामुळे पोर्तुगीज सत्ता गोव्यातून गेली पाहिजे असे मला वाटत आले होते म्हणूनच स्वार्थाची गणिते न मांडता मी अध्यापनाच्या कार्याला लागलो.

१०) त्याच काळात मी कथा लिहायला लागलो. मराठी साहित्यसंमेलन मडगाव येथे भरले होते. त्यावेळी माझ्या काही कथा 'यशवंत' मासिकातून प्रसिद्ध झाल्या होत्या. त्यापूर्वी मी वर्तमानपत्रातून लेख लिहित होतो. त्यासाठी मी त्याकाळच्या श्रेष्ठ मराठी लेखकांच्या साहित्याचा बराच अभ्यास केला होता. न. चिं. केळकरचे साहित्य मला आवडले होते. त्यांच्या शैलीचा प्रभाव माझ्यावर खूप पडला होता. त्याशिवाय इतरही जूने लेखक मी वाचून काढले होते. 'सुधारक'चे आगरकर, शिवराम महादेव परांजपे, कादंबरीकार वामन मल्हार जोशी, नाटककार खाडिलकर, वरेरकर, कवी गोविंदाग्रज अशा लेखकांचे साहित्य मी बारकाईने अभ्यासले होते. त्यामुळे कथालेखन करण्यापूर्वीच माझी लेखनशैली तयार झाली होती. पुण्याच्या 'केसरी' मध्येही मी काही लेख लिहिले

होते.

११) कथांच्या बाबतीत आलेले गोड कटू अनुभव खूप आहते. माझ्या पहिल्
'यशवंत', 'रत्नाकर', 'पारिजात,' 'जोत्स्ना' इत्यादी प्रमुख मासिकांतून प्रसिद्ध
लागल्या त्यावेळी मराठी रसिकांनी आणि समालोचकांनीही माझ्यावर स्तूतीच
केला असे आठवते. वि. स. ...डेकर न. चिं. केळकर, माधव मनोहर ह्यांच्या
श्रेष्ठ टिकाकारांनी माझ्या कथासंग्रहावर परिक्षण लिहिले. 'यशवतं' मासिकाने ल
कथास्पर्धेत मला दुसरे बक्षिस मिळाले. पहिले श्री. य. गो. जोशी यांच्या 'शे
शेंगा' या कथेला. तिसरे बक्षीस वि. स. खांडेकरांना मिळाले. या अनपेक्षित य
माझा त्यावेळी विशेष बोलबाला झाला. 'प्रादेशिककथासाहित्यप्रवर्तक' म्हणून
वाचक माझ्या कथासाहित्याकडे उत्सुक नजरेने पाहू लागले. महाराष्ट्रात मला
अनुभव हा मोठा गोडा (गोड) आहे. गोव्यात जो अनुभव आला तो कडूच
पाहिजे. कारण गोवेकर वाचक माझ्या कथा वाचत पण माझ्या कथांची
करणारेच मला अधिक दिसून आले. टिंगल अशासाठी की मी गोव्याच्या कलावं
कथा लिहित होतो. ह्या वर्गावर कथा लिहिणे हाच त्यांना गुन्हा वाटत अ
त्यावेळी 'आलमैदा कॉलेज'चा मुख्याध्यापक होतो. एका प्राध्यापकाने अशा
कथा लिहून त्या प्रसिद्ध करणे हा आमच्या संस्थेच्या चालकाच्या दृष्टीने मोठ
होता. ज्या कथांनी मराठी रसिकांना वेड लावले होते त्याच कथांच्या ब
चिकित्सक गोवेकर वाचक उदासीन दिसले.

१२) मी लिसेंवच्या चवथ्या वर्षात असतानाच माझे लग्न झालं. त्यावेळी मला वीस व
झाली नव्हती, त्या काळात मुलामुलीची लग्ने लहानपणीच होत. मी लिसेवच
पूरा केला तेव्हा मी दोन मुलांचा बाप झालो होतो.

१४) १९३०-४० हा काळ (पहिल्या) माझ्या कथासाहित्यात पहिल्या अवस्थेतल
काळात मी दीडदोनशे कथा लिहिल्या असाव्यात. पहिला कथासंग्रह 'कल्पवृ
छायेत' हा. या संग्रहाने मला खूप किर्ती मिळवून दिली. त्यानंतर 'सागराच्या
'वादळातील नौका', 'ढासळलेले बुरूज' 'अनिताचे दिव्य' (आनीतेचे दिव्य)
संग्रह प्रसिद्ध झाले 'ढासळलेले बुरूज' या कथासंग्रहाला आचार्य काकासाहेब काल
यांनी प्रस्तावना लिहिली. तिच्यात त्यांनी 'लक्ष्मणराव हे एक सिद्धहस्त कथा
आहेत' अशा शब्दात माझ्या कथांची वाखाणणी केली. 'प्रादेशिक साहित्याचा प्र

म्हणून टिकाकारांनी **माझी प्रशंसा** केली खरी पण ती नंतरच्या काळात बाधक ठरली. कारण माझ्या कोणत्यांही कथांवर प्रादेशिकतेचा छाप बसविला (मारला) गेला. आणि प्रादेशिकतेच्या दृष्टिकोनातूनच टिकाकार माझ्याकडे पाहू लागले. विषय, आशय, व्यक्तिरेखाटन इत्यादी गोष्टींकडे त्यांचे दुर्लक्ष झाले. नवकथेच्या उदयानंतर हे असे अधिक प्रमाणात व्हायला लागले. मी १९४९ साली मुंबईला गेलो. आणि स्वातंत्र्यसंग्रामाच्या काही काळात माझे वास्तव्य तेथे झाले. त्याचवेळी मला माझ्या 'मोहोर' कथेला Newyork Herald Tributne या अमेरिकन दैनिकाने लावलेल्या जागतिक स्पर्धेत (मला) मराठीचे पहिले बक्षीस मिळाले. त्यामुळे ही कथा जगातील प्रमुख भाषातून अनुवादित झाली. मुंबईला १५ वर्षाच्या वास्तव्यात मी खूप कथा लिहून काढल्या माझ्या दृष्टीने पहिल्या अवस्थेतील प्रादेशिक कथापेक्षाही या दुसऱ्या अवस्थेतील कथा, संख्या आणि गुण ह्या दोन्ही दृष्टींनी चांगल्या आहेत असे मला वाटते.

१९४४ साली गोमांतकात स्वातंत्र्यसंग्रामाचा उद्रेक झाला. आणि लगेच मी त्या प्रवाहात सामिल झालो. माझी घरची परिस्थिती त्यावेळी चांगली नव्हती. दोन मुले मुंबईला शिकत होती. अशा परिस्थितीत मी चळवळीत पडलो याचे कारण एकच, ते असे की पोर्तुगीजांच्या गुलामी सत्तेविरुद्ध संघटित चळवळ व्हावी असे मनापासून वाटत होते. तशा मानसिक अवस्थेत असताना मी 'मांडवी, तू आटलीस?' ही कादंबरी लिहिली होती.

ऑक्टोबर १९४६मध्ये पणजी येथे मी भाषणबंदीचा कायदा मोडून सत्याग्रह केला. त्या एकाच दिवशी गोव्याच्या वेगवेगळ्या शहरातून माझ्या कित्येक सहकाऱ्यांनी सत्याग्रह केला. बेळगाव येथे डॉ. लोहियांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कार्यकर्त्यांच्या मोठ्या सभेत 'नॅशनल काँग्रेस, गोवा'च्या प्रमुख कार्यकर्त्यांनी सत्याग्रह केलाच पाहिजे असा आग्रह मी धरला. पूर्वतयारी झाल्याशिवाय मोठ्या प्रमाणावर सत्याग्रह करु नये असे म्हणणाऱ्या कार्यकर्त्यांचा एक गट तेथे आला होता. सत्याग्रहाला सुरवात केल्याशिवाय चळवळीला जोर येणार नाही असे मला वाटत होते. माझ्या कार्यकर्त्यांनाही तेच वाटत होते. म्हणून डॉ. लोहियांच्या भाषणानंतर मतदानाची वेळ आली तेव्हा मी हात उचलून सत्याग्रहाच्या बाजूने मत दिले आणि मग भराभर इतर कार्यकर्त्यांनी मला साथ दिली. मग थोड्याच दिवसानंतर पणजी येथे माझा सत्याग्रह पार पडला. मग कोर्टात निवाडा होऊन मला एक महिन्याची शिक्षा झाली आणि 'रैषमाग' (रेईश मागूश) ह्या किल्ल्यात रवानगी करण्यात आली. १९४७ साली सरहद्दीवर मोठ्या

जनसमुदायासमोर माझे भाषण झाले. या गुन्ह्याबद्दल मला अटक करण
'आग्वाद' किल्ल्यात कैदी म्हणून ठेवण्यात आले. तेथे वर्षभर होतो.

१७) 'आग्वाद' फोर्टमध्ये मी वर्षभर होतो. तेथेच निग्रो सैनिकाचा सहवास घडल आफ्रिकेत पोर्तुगीज लोक कसे अत्याचार करतात ते मला निग्रो शिपायांक निग्रो पहारेकरी माझ्याव... असत. मी त्यांना पोर्तुगीज वाचायला शिक पाव, बिस्किटे देत असे. त्यामुळे ते माझे मित्र बनले होते. रात्रीच्यावेळ जवाबदारीवर ते मला आणि माझ्या एका ख्रिश्चन सहकाऱ्याला बाहेर सो आम्हाला समुद्रकिनाऱ्यावर फिरवून परत आणीत ; एवढे त्यांचे प्रेम आ राजबंद्यांनी मिळविले होते.

१८) १९४९ साली मी मुंबईला आलो त्याचे कारण असे – आमच्या 'नॅशन गोवा'ला गोव्यात उघड सभा घेता येत नसत. प्रचार करता येत नसे. त्यामु भारी कुचंबणा होई. शिवाय केंद्र सरकारलाही आमच्या चळवळीत अ सहभागी करण्याचे नाजूक कामही आम्हाला करावयाचे होते. म्हणून आम्ही कॉंग्रेस(गोवा)'चे मुख्य ठाणे मुंबईला आणले. त्यामुळे मला मुंबईतही राज करायला वाव मिळाला. त्यावेळी मी तेथे गोवेकरांच्या संघटनेचे कार्य हा त्याचप्रमाणे आमच्या कार्याचा प्रचार वेगवेगळ्या वर्तमानपत्रांतून केला. कित मी त्यावेळी 'लोकमान्य', 'नवशक्ती' 'नवयुग' इत्यादि नियतकालीकातून जयप्रकाश नारायण ह्यांच्या अध्यक्षतेखाली एक मोठी conferenc 'कॉंग्रेस हाऊस' मध्ये जागा मिळवून तेथे गोवेकरांच्या शेकडो सभा घेतल नेहरू आणि त्यांचे अधिकारी यांच्या राजभवनात गाठी, भेटी झाल्या (घेतल रीतीने आमच्या चळवळीचे कार्य करीत होतो.

१९) १९५९ साली मला दिल्लीच्या नभोवणीचे निमंत्रण आले. नभोवाणीवर मराठी, कोंकणीच्या विभागाचा मुख्य या नात्याने काम करण्यासाठी. पोर्तुगी विरुद्ध त्यांच्या राजकीय धोरणाविरूद्ध प्रचार करण्यासाठी माझी गरज भास मला नवी दिल्ली येथे जावे लागले. हे कार्य आमच्या चळवळीला पुरक हो मी ते स्वीकारले आणि पाच वर्षे दिल्लीला राहून नभोवाणीवरून सलाजारविरो केला. आमचा प्रचार कोंकणी, पोर्तुगीजा (पोर्तुगीज) पुरता मर्यादित न बाहेरच्या पंचवीस तीस भाषातून अनुवादित होऊन प्रसारित होत असे.

माझ्या कथाही त्यावेळी वेगवेगळ्या भाषातून प्रसारित झाल्या आहेत. १९६१ साली गोवा मुक्त झाला तेव्हा मी माझ्या जागेचा राजीनामा देऊन मोकळा झालो.

१९६३ साली मी गोव्याला परतलो. इथे मी पुन्हा दुसऱ्या प्रकारच्या चळवळीत पडलो. गोव्याच्या विलिनीकरणाचा प्रश्न त्यावेळी उपस्थित झाला. गोव्याचे विलिनीकरण होऊ नये. तो स्वतंत्र घटक म्हणून नांदावा म्हणूनं विलिनीकरणविरोधी आघाडी स्थापन करण्यात मी भर घेतला आणि त्या आघाडीचा अध्यक्ष झालो. हे कार्य खेडोपाडी जाऊन करावे लागले. तेथील राजकीय पक्षही ह्या आघाडीत सामील झाले. सतत तीन वर्षे ही चळवळ चालू राहिली. आणि शेवटी तिला यश आले. १९६६ मध्ये केंद्रसरकारने गोव्यात कौल घेतला आणि आमच्या आघाडीला बहुमत मिळून गोवा महाराष्ट्रात ढकलण्याचे विरोधकांचे कारस्थान फसले. गोवा संघप्रदेश राहिला.

कोंकणीकडे मी बऱ्याच उशिरा वळलो. मुंबईत असताना कोंकणी रेडियोसाठी लिहित होतो. त्याचवेळी काही कोंकणी मासिकांसाठी लिहित होतो पण त्या लेखनाला माझ्या दृष्टीने फारसे मोल नव्हते. गोव्याच्या मुक्तीनंतर कोंकणीच्या पूर्नजीवनाला (पुनरुज्जीवनाला) जोर आला. त्याच वेळी मी या कोंकणी आंदोलनात सामील झालो. कोंकणी ही गोव्याची लोकभाषा. तिचा उत्कर्ष झाल्याशिवाय गोव्याच्या राजकीय व इतर क्षेत्रातही उत्कर्ष होणार नाही असे मला ज्यावेळी कळून चुकले त्याचवेळी माझ्या हातून थोडे कोंकणी साहित्य निर्माण झाले. कथा थोड्याच लिहिल्या, परंतु ललितलेख अधिक लिहिले. 'पापडां कवळ्यो' ही लघुकादंबरी, 'खबरी: काय कर्माच्यो, काय वर्माच्यो' हा संग्रह 'कथाशिल्प' हे समीक्षापर पुस्तक आणि 'वागाशिकार' हे मुलांसाठी पुस्तक अशी चार पुस्तके गोव्यात असताना लिहून प्रसिद्ध केली.

तुर्त चार-पाच पुस्तके लिहून पुरी करण्याचा संकल्प सोडला आहे. 'आग्वादचे तट' व 'पुरूषोत्तम' ह्या कादंबऱ्या. अलिकडेच 'बिजेची कोर' आणि 'गोव्याकडली माणसे' ही पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. लवकरच निवडककथांचा संग्रह आणि 'कडुनिंब' ही पुस्तके प्रसिद्ध होतील.

*मुंबई आकाशवाणी केंद्रावरील नियोजित मुलाखतीसाठी स्वत: लक्ष्मणरावांनी जानेवारी १९८६च्य दरम्यान तयार केलेले टीपण. ४ फेब्रुवारी १९८६ रोजी झालेल्या त्यांच्या आकस्मिक निधनामुळे दुर्दैवाने ही मुलाखत ध्वनिमुद्रित* होऊ शकली नाही.

श्रीमान कवी वेणि माधव बोरकर, आकाशवाणी, पणजी केंद्र; यांच्या सौजन्याने.)

# पत्रभेट

: १ :

**(श्रीयुत नारायण मावजो, मडगाव – गोवा यांना पाठविलेले पत्र)**

४-३-१९६५ ? (१९८५)

प्रिय नारायणबाब यांस सप्रेम नमस्कार,

तुमचे कुशल इच्छितो. हृदयविकाराच्या सौम्य झटक्यामुळे गेल्या नोव्हेंबर महिन्यात मी आजारी होतो. आत बरा आहे. तरीही तज्ञ डॉक्टरांचा औषधोपचार चालू आहे. माझी दुसरी मुलगी चि. निर्मला साखरदांडे हिच्याकडे असतो. तिच्याच आग्रहामुळे इकडे आलो. पुन्हा लेखनाला सुरूवात केली आहे. दोन–तीन पुस्तके पुण्याला छापत आहेत. प्रसिद्ध झाल्यावर पाठवून देईन. तुमच्या मंडळीचा – बायको, मुलगी व आई वडिलांचा–समाचार अवश्य कळवावा. तुम्ही मुंबईला आलात तर खालील पत्त्यावर भेटून जावे. एक दिवस माझ्याकडे रहावे. मी रहातो त्या फ्लॅटमध्ये सगळ्या सोई आहेत. तुम्ही एकदोन दिवस सहज राहू शकता. श्री. उदय भेंब्रो निवडणुकीत विजयी झाले ते वाचून फार आनंद झाला. मी त्यांना एक पत्र देखील खरडले. चि. मनोहर व शशिकांत यांची पत्रे येतात. मी आणखी पाच सहा महिने इकडेच रहाणार आहे. पुण्याच्या माझ्या प्रकाशकाला दोन कादंबऱ्या लिहून देण्याचे कबुल केले आहे. मराठी लेखनिक चांगला मिळाला आहे. त्याला कोंकणी कळत नाही म्हणून हें पत्र मराठीत लिहिले आहे. सवडीनुसार पत्र पाठवावे. व माझ्या मांगच्या दोन फोटोंच्या तीन–तीन कॉपीज पाठवून द्याव्यात. कॅनरा बँकेवर चेक पाठवून देईन. पैसे किती पाठवायचे ते कळवावे. तुमची भेट होत नसल्यामुळे फार वाईट वाटते. तुमची मला सवय झाली होती. पत्रोत्तर यावे.

तुमचा,

**लक्ष्मणराव**

C/o दुर्गादास साखरदांडे
२२, ओम. विजय श्री सोसायटी,
दिक्षीत रोड, विस्तारीत,
विलेपार्ले (पूर्व)

('**कुळागर**' मार्च १९८६च्या अंकावरून साभार. )

: २ :

(श्रीमती मोगूबाई जयवंतराव सरदेसाई यांना पाठविलेले पत्र)

विलेपार्ले, १२–७–

चि. सौ. मोगरूबाईस, सप्रेम आशीर्वाद,

तुझे प्रेमळ पत्र मिळाले. वाचून फार बरे वाटले.......

...... टी. व्ही. वरचा कार्यक्रम पुष्कळ जणांना आवडला तरी पण मला आवडला नाही. कारण बोलायला फार थोडा वेळ मिळाला. मला तर खूप खूप सांगा होते. माझी ही अडचण लक्षात घेऊन टी.व्ही.च्या अधिकाऱ्यांनी 'प्रतिभा आणि प्रति हा मराठी कार्यक्रम मला देऊ केला आहे. ही मुलाखत श्री. जयवंत दळवी घेतील माझ्याकडे दोनदा येऊन गेले. 'गोमंतका'त प्रसिद्ध झालेल्या माझ्या ललितलेखांचा सं 'कडुनिंब' या नावाखाली लवकरच प्रसिद्ध होणार आहे. त्याशिवाय 'The best Laxmanrao' हा निवडक कथांचा संग्रह नामवंत कादंबरीकार श्री. ज. जो संपादित आहेत. मी तुर्त 'आग्वादचे तट' ही स्वातंत्र्यसंग्रामावरील कादंबरी लिहित अ त्याशिवाय 'पुरूषोत्तम' ही मोठी कादंबरी लिहिण्याचा संकल्प सोडला आहे. म आतंरराष्ट्रीय पारितोषिक मिळवून देणाऱ्या 'मोहोर' (मोहर) कथेवर आधारलेली अ ही कादंबरी आहे. पुरूषोत्तमबाब केंकऱ्याच्या जीवनावर ही कादंबरी आहे. ब आख्यायिका गोळा केल्या आहेत. आणखी काही महिती मिळवण्यासाठी कुंभार कालापूर अशा गावात जाऊन पुरूषोत्तमबाबांचे जीवन अभ्यासले पाहिजे. माझ्या संकल्पाप्र ही कादंबरी उतरली तर ते माझे Obra Prima होईल. गोव्याला आल्य जयवंतरावांच्या मदतीने थोडा प्रवास करावा लागेल. तुम्हा सगळ्यांच्या सदिच्छा आहे

सवडीप्रमाणे पत्र लिहावे.

कळावे, हे आशीर्वाद.

तुम्हा सगळ्यांच

**लक्ष्मणराव**

(प्रा. माधवी सरदेसाइ यांच्या सौजन्याने.)

**टीपः** वरील पत्रातील प्रारंभींचा खाजगी मजकूर गाळला आहे.

: ३ :

**(ज्येष्ठ कोंकणी साहित्यिक आणि समिक्षक अ. ना. महांबरे यांना पाठविलेले पत्र)**

विलेपार्ले

३/१२/१९८५

र अ. ना. महांबरे यांस, सप्रेम नमस्कार.

माझे पत्र मिळालेच असेल. आपल्याला 'कुळागर'चा दिवाळी अंक अजून मिळाला ही का? मला मिळाला नाही. तरी त्याची एक प्रत मला पाठवून द्यावी. माझ्या पत्राचे र न आल्यामुळे अशी शंका आली की आपण दिवाळीला गोव्याला गेला असाल. या वसात सवड असल्यास इकडे येण्याची तसदी घ्यावी. आपल्याला सवड मिळत नसल्यास णाकडूनही आपल्याकडे असलेले 'कदंब'चे दोन दिवाळी अंक पाठवून द्यावे. त्यात लेल्या माझ्या आत्मवृत्ताची मला गरज आहे. त्याची नक्कल करून घेवून माझ्या प्रकाशकाकडे ठवायचे आहे. त्याचप्रमाणे माझ्यावरच्या लेखाचे हस्तलिखित, आणि 'खबरी' हे कोंकणी तक पाठवून द्यावे. ते दुसऱ्याकडून उसनवट घेतले होते. गेल्या बऱ्याच दिवसात आपली ट झाली नाही म्हणून आपल्या आगमनाची वाट पहात आहे. येत्या शनिवारी किंवा रविवारी वे. कोकणी, मराठीचे भांडण सध्या हातघाईवर गेले आहे असे 'लोकसत्ता'मधील बातम्या न वाटते. आपल्याला खरी माहिती मिळाली असल्यास कळवावी. आपल्या मंडळीचे क्षेम छतो.

ळावे, लोभ असावा ही विनंती.

आपला

**लक्ष्मणराव**

. कलम

चे पत्र मिळाले. 'कुळागर' चा अंक अजून मिळाला नाही. मला तो अंक व लेखाचे कात्रण ठवून देण्यास सांगावे.

या दिवसात तुम्ही सवडीनुसार येऊन जावे. मुलाखतीचा मी पाठविलेला मजकूर णण्यास विसरू नये. दिवाळी अंकांची फारच गरज आहे. माझ्या आत्मवृत्ताचे दोनही लेख याच्या प्रकाशकांना पाठवायचे आहेत. तुम्ही डिसेंबर महिन्यात किंवा जानेवारीच्या पहिल्या ठवड्यात गोव्याला जाणार असलात तर मला आवश्य (अवश्य) कळवावे. म्हणजे मला

